अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारीत नियम २०१२ च्या अंतर्गत सामुहिक वन हक्कांच्या अंमलबजावणीसाठी १४ जिल्हयातील ३ जिल्हा व्यवस्थापक व ३९ तालुक्यांसाठी ३३ तालुका व्यवस्थापकांच्या खर्चास निधी उपलब्ध करुन देणेबाबत. **( २२२५ डी ३६९ )**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६/ प्र. क्र.०८ /कार्यासन.६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: - २७ फेब्रुवारी, २०१७.

<u>वाचा -</u>

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८० / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१६.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८९ / अर्थ-३, दि. २०.०४.२०१६.
३) आ.वि. वि. शासन निर्णय क्र. राज्यपा-२०१५ /प्र.क्र.८६ /का-१६,दि. ०३-०३-२०१६.
४) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. आविवि - २०१६/प्र.क्र.७१/कार्या-०८.

**शासन निर्णय-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारीत नियम २०१२ च्या अंतर्गत सामुहिक वन हक्कांच्या अंमलबजावणीसाठी १४ जिल्हयातील ३ जिल्हा व्यवस्थापक व ३९ तालुक्यांसाठी ३३ तालुका व्यवस्थापकांच्या तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी तत्वावर सहा महिन्यांसाठी मानधन तत्वावर नेमणूका करण्यास शासनाच्या दिनांक ३ मार्च, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदरहू व्यवस्थापकांच्या मानधनाकरिता रु.५०,२३,५००/- ( रुपये पन्नास लाख तेवीस हजार पाचशे फक्त ) इतकी तरतूद अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरहू खर्च सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षातील मागणी क्र. टी-५, २२२५ अनुसूचित जाती , अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०१) (५३) आदिवासी कक्षामार्फत राज्यातील अनुसूचित क्षेत्रामध्ये पथदर्शी क्षेत्रामध्ये प्रकल्पाची अंमलबजावणी ( २२२५ डी३६९), ३१- सहायक अनुदाने याखाली अर्थसंकल्पीत तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

२. सदरची तरतूद नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६ नुसार विभागास प्राप्त अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०२२७१५१५०९४२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.02.27 15:29:10 +05'30'

**भगवान सावंत**
शासनाचे अवर सचिव.

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
५. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.